आधारभूत किंमत खरेदी योजनेअंतर्गत खरीप पणन हंगाम २०१४-१५ मधील खरेदी केलेल्या धानासाठी केंद्र शासनाने निश्चित केलेल्या दराव्यतिरिक्त धान उत्पादक शेतक-यांना प्रति क्विंटल रु. २५०/- प्रोत्साहनपर राशी (Paddy Procurement Incentive Support) राज्यशासनाकडून मंजूर करण्याबाबत

**महाराष्ट्र शासन**

**अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः खरेदी-१०१५/प्र.क्र.१०६/ नापू २९**

**मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक**

**मंत्रालय, मुंबई ४०० ०३२**

**दिनांक: २१ मे,२०१५**

**वाचा -**

१) शासन निर्णय क्रमांकः खरेदी-१०१४/५८७/प्र.क्र.१२९/ नापु २९, दि. ३०.१०.२०१४

२) शासन निर्णय क्रमांकः खरेदी-१०१४/५८७/प्र.क्र.१२९/ नापु २९, दि.१८.११.२०१४

**प्रस्तावना -**

आधारभूत किंमत खरेदी योजना ही केंद्र शासनाची योजना असून ती शेतकऱ्यांच्या हितासाठी आहे. या योजनेअंतर्गत केंद्र शासन निरनिराळया पिकांच्या किमान आधारभूत किंमती जाहीर करते व आधारभूत किंमतीचा लाभ होण्याच्या दृष्टीने शेतक-यांना हमी भावापेक्षा कमी किंमतीने (डीस्ट्रेस सेल) धान्य विकावे लागू नये म्हणून राज्य शासनातर्फे धान्याची ( एफ. ए. क्यू. धान व भरडधान्य ) खरेदी करण्यात येते. महाराष्ट्र राज्यात केंद्र शासनाची "नोडल एजन्सी" म्हणून भारतीय अन्न महामंडळ काम पहाते तर भारतीय अन्न महामंडळाच्या वतीने राज्य शासन महाराष्ट्र राज्यात आधारभूत किंमत खरेदी योजनेची अंमलबजावणी राज्य शासन मान्यताप्राप्त अभिकर्ता संस्थेमार्फत करते. सदर योजनेअंतर्गत खरेदी केलेल्या धानाची भरडाई अभिकर्ता संस्थांच्यामार्फत मिलर्सकडून करून घेऊन प्राप्त होणारा सीएमआर (तांदूळ) भारतीय अन्न महामंडळाकडे जमा करण्यात येतो. खरेदी केलेल्या भरडधान्याची भारतीय अन्न महामंडळामार्फत निविदाव्दारे अथवा इतर राज्यातील सार्वजनिक वितरण व्यवस्थेअंतर्गत वितरित करून विल्हेवाट लावली जाते.

खरीप पणन हंगाम २०१४-१५ साठी केंद्र शासनाने धानाची आधारभूत किंमत साधारण धानासाठी रु.१३६०/- व “अ” ग्रेड धानासाठी रु.१४००/- इतकी ठरविलेली आहे. चालू हंगामात अवकाळी पावसामुळे व विविध नैसर्गिक आपत्तींमुळे धान उत्पादक शेतकरी अडचणीमध्ये आलेला आहे. त्यामुळे या धान उत्पादक शेतक-यास प्रोत्साहनपर राशी (Paddy Procurement Incentive Support) देण्याबाबत सहानुभूतीपूर्वक विचार होणे आवश्यक आहे. तथापि, केंद्र शासनाने त्यांच्या दिनांक १२ जून,२०१४ च्या पत्रान्वये, राज्य शासनाने बोनस देण्याचा निर्णय घेतल्यास आधारभूत किंमत खरेदी योजना राबविण्याची संपूर्ण जबाबदारी राज्यशासनाची राहील व या योजनेस केंद्र शासनाकडून कोणतीही आर्थिक भरपाई मिळणार नाही असे स्पष्टपणे कळविले आहे. तरीदेखील नैसर्गिक आपत्तीमुळे राज्यातील धान उत्पादक शेतकरी अडचणीत आलेला असल्याची बाब विचारात घेऊन चालू हंगामात

प्रति क्विंटल रु. २५०/- प्रोत्साहनपर राशी (Paddy Procurement Incentive Support) धान उत्पादक शेतक-यास देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. सबब मंत्रीमंडळाच्या मान्यतेने शासनाने पुढीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

## शासन निर्णय -

हंगाम २०१४-१५ मधील आधारभूत किंमत खरेदी योजनेअंतर्गत खरेदी केलेल्या धानासाठी, केंद्र शासनाने मंजूर केलेल्या “साधारण” धानासाठी प्रतिक्विंटल रु. १३६०/- व “अ” ग्रेड धानासाठी प्रतिक्विंटल रु. १४००/- या किमान आधारभूत किंमतीपेक्षा अतिरिक्त रु.२५०/- प्रतिक्विंटल प्रोत्साहनपर राशी (Paddy Procurement Incentive Support) धान उत्पादक शेतकऱ्यांना मंजूर करण्यात येत आहे. सदर रक्कम धान उत्पादक शेतक-यांना रेखांकित धनादेशाद्वारेच अदा करण्यात यावी.

२. सदर अतिरिक्त प्रोत्साहनपर राशी केवळ हंगाम २०१४-१५ मध्ये खरेदी होणा-या धानासाठीच लागू राहील.

३. खरीप पणन हंगाम २०१४-१५ मधील किमान आधारभूत किंमतीवर प्रोत्साहनपर राशी द्यावयाची असल्याने, हंगाम २०१४-१५ साठीचे धान / भरडधान्य आदेश दि. ३० ऑक्टोबर, २०१४ मध्ये खाली नमूद केलेल्या सर्व अटी व शर्तीनुसारच खरेदी केला जाईल याची दक्षता घ्यावी.

१) मार्केटिंग फेडरेशन आणि आदिवासी विकास महामंडळ या दोन अभिकर्ता संस्थांकडून सुरु केलेल्या खरेदी केंद्रांवर येणा-या शेतक-याचा धान हा प्रत्यक्ष शेतक-यांनेच आणलेला आहे याची खातरजमा करण्यासाठी खरेदीकेंद्रावर येणा-या प्रत्येक शेतक-याच्या ७/१२ च्या उता-याची काटेकोरपणे तपासणी करण्यात यावी.

२) शेतक-याने सादर केलेला ७/१२ चा उतारा त्यावरील जमीनीचे क्षेत्रफळ व शेतक-याने विक्रीकरिता आणलेले धान्य याचा सरासरी उत्पादकतेशी यथायोग्य ताळमेळ घालण्यात यावा. जेणेकरुन कोणत्याही शेतक-याकडून धान्याची आवक अवाजवी प्रमाणात होणार नाही.

३) कोणत्याही परिस्थितीत व्यापा-यांकडून किंवा मिलर्सकडून खरेदी केंद्रावर धान येणार नाही याची दक्षता घेण्यात यावी.

४) जिल्हा मार्केटिंग अधिकारी तसेच आदिवासी विकास महामंडळाचे प्रादेशिक व्यवस्थापक यांचेशी जिल्हा पुरवठा अधिकारी यांनी प्रत्यक्ष संपर्क ठेवून धान खरेदी नियमानुसार होते किंवा कसे याबाबत व्यक्तीशः देखरेख ठेवावी.

५) यासाठी दोन्ही अभिकर्ता संस्थांमार्फत सुरु केलेल्या धान खरेदी केंद्रांवर आकस्मिकरित्या भेट देवून योग्य ती तपासणी करावी.

६) धान खरेदी करताना त्यासाठी केंद्र शासनाने विहित केलेले निकष/ विर्निदेश यांचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे. कोणत्याही परिस्थितीत कमी प्रतीचे ( Non F.A.Q.) धान खरेदी केले जाणार नाही याबाबतच्या सक्त सूचना खरेदी केंद्रांवरील ग्रेडर्सना देण्यात याव्यात.

७) प्रत्येक खरेदी केंद्रांवर आर्द्रतामापक यंत्रे उपलब्ध आहेत किंवा कसे याची पाहणी करुन जर अशी यंत्रे उपलब्ध नसल्यास ती तातडीने उपलब्ध करुन देण्याबाबत संबंधित जिल्हा मार्केटिंग अधिकारी/ प्रादेशिक व्यवस्थापक यांना सूचना देण्यात याव्यात.

८) प्रत्येक धान खरेदी केंद्रावर ग्रेडर्स/ गुणनियंत्रक अधिकारी उपलब्ध आहे किंवा कसे याची पाहणी करावी. व नसल्यास त्याबाबतची पूर्तता संबंधित जिल्हा मार्केटिंग अधिकारी/ प्रादेशिक व्यवस्थापक यांचेकडून करुन घ्यावी.

९) संबंधित जिल्हयाच्या जिल्हा पुरवठा अधिकारी यांनी देखील धान/भरडधान्य खरेदी केंद्रावर देखरेखीची चोख व्यवस्था ठेवावी व कोणताही अनुचित / गैरवाजवी प्रकार होत नाही याची दक्षता घ्यावी.

४. अभिकर्ता संस्थेने सदर योजनेखाली शेतक-यांचे धान खरेदी करताना त्यांच्याकडील ७/१२ चा उतारा पाहूनच धान खरेदी करावे. तसेच प्रोत्साहनपर राशीची रक्कम अदा करतानाही ७/१२ चा उतारा पाहूनच सदर रक्कम संबंधित शेतक-यांना दिली जाईल, याची दक्षता घ्यावी. बिगर शेतक-यांकडून कोणत्याही परिस्थितीत धान खरेदी होणार नाही., याची संपूर्ण दक्षता अभिकर्ता संस्थांनी घ्यावयाची आहे.

शेतक-यांव्यतिरिक्त अन्य व्यक्तींकडून धान खरेदी केल्यास व अशा कोणत्याही तक्रारी शासनास प्राप्त झाल्यास संबंधित जबाबदार अधिकारी/ कर्मचारी यांचेविरुध्द कठोर कारवाई करण्याची कार्यवाही संबंधित अभिकर्ता संस्थांनी करावी.

५. वरील प्रोत्साहनपर राशीमुळे २०१४-१५ च्या हंगामातील खरेदी केलेल्या धानासाठी येणाऱ्या अंदाजे रु. ५२ कोटी इतक्या अतिरिक्त खर्चास मान्यता देण्यात येत आहे

६. याकरिता येणारा अतिरिक्त खर्च या विभागाच्या स्वीय प्रपंची लेख्यातून (PLA) भागविण्यात यावा व मागणी क्र. एम-४ ४४०८, अन्न साठवण व वखार साठवण, यावरील भांडवली खर्च (१०१) प्रापण व पुरवठा (०२) प्रापण ,वितरण व किंमत नियंत्रण (०२) (०१), मुंबई, शहर ४४०८००७७ (२१) पुरवठा व सामुग्री" या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

७. हा निर्णय दि. ३० ऑक्टोबर, २०१४ पासून सुरु झालेल्या खरीप पणन हंगाम २०१४-१५ साठी पूर्वलक्षी प्रभावाने लागू राहील.

८. सदरहू शासन निर्णय मा. मंत्रीमंडळाच्या घेतलेल्या निर्णयानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१५०५२११७३५०४८२०६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SATISH SHRIDHAR SUPE

Digitally signed by SATISH SHRIDHAR SUPE
DN: CN = SATISH SHRIDHAR SUPE, C = IN, S = Maharashtra, O = Government of Maharashtra, OU = FOOD CIVIL SUPPLY AND CONSUMER PROTECTION
Date: 2015.05.21 17:36:21 +05'30'

**( सतिश सुपे )**
उपसचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा. राज्यपाल यांचे सचिव.
२. मा. मुख्यमंत्री यांचे सचिव.
३. मा. उप मुख्यमंत्री यांचे सचिव.
४. मा. मंत्री, अन्न,नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण यांचे खाजगी सचिव.
५. मा. मंत्री, वित्त यांचे खाजगी सचिव.

६. मा. मंत्री, पणन यांचे खाजगी सचिव.
७. मा. मंत्री, आदिवासी विकास, यांचे खाजगी सचिव.
८. मा. राज्यमंत्री, अन्न,नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण, यांचे खाजगी सचिव.
९. मा. सर्व मंत्री / राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव.
१०. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय,मुंबई.
११. प्रधान सचिव, (वित्त) महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई.
१२. सचिव, अन्न,नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग.
१३. अपर मुख्य सचिव, कृषि व प.दु.म. विभाग, मंत्रालय, मुंबई,
१४. प्रधान सचिव, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय,मुंबई.
१५. प्रधान सचिव, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय,मुंबई.
१६. अपर मुख्य सचिव, महसूल व वन विभाग,मंत्रालय,मुंबई.
१७. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र स्टेट को.ऑप.मार्केटिंग फेडरेशन लि., कनमूर हाऊस,नरसी नाथा स्ट्रीट,मुंबई- ४०० ००९,
१८. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी आदिवासी विकास महामंडळ, आदिवासी विकास भवन, २ रा माळा, राम गणेश गडकरी चौक, जुना आग्रा रोड,नाशिक-२,
१९. सर्व विभागीय आयुक्त.
२०. नियंत्रक (शिधावाटप) व संचालक नागरी पुरवठा(गो/वा),मुंबई,
२१. सर्व जिल्हाधिकारी,
२२. सर्व उप आयुक्त (पुरवठा),
२३. सर्व जिल्हा पुरवठा अधिकारी,
२४. सर्व अन्नधान्य वितरण अधिकारी,
२५. वित्तीय सल्लागार व उप सचिव, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, मुंबई,
२६. उप संचालक, नागरी पुरवठा, पुरवठा आयुक्त कार्यालय, मुंबई.
२७. सर्व उप सचिव/अवर सचिव/सर्व अधिकारी,अ.ना.पु.व ग्रा.सं.विभाग, मंत्रालय विस्तार, मुंबई,
२८. सर व्यवस्थापक,(महा.) भारतीय अन्न महामंडळ,५ वा माळा, राजेंद्र नगर, दत्तपाडा रोड, बोरीवली पूर्व मुंबई-४०० ०६६.
२९. महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई ( ५ प्रती ),
३०. ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय,ग्रंथालय ६ वा मजला,विधान भवन,मुंबई. (१०प्रती)
३१. मान्यताप्राप्त राजकीय पक्षांची कार्यालये, ( प्रत्येकी ५ प्रती ),
३२. सर्व विधान परिषद सदस्य व विधान सभा सदस्य
३३. निवड नस्ती (नापु-२९).